

ई साहीत्य प्रकाशन

# !! रंगपंचमीच्या हार्दिक शुभेच्छा !!




**संपादक**

रेणूका खटावकर(रेपाळ) - (अमेरिका)

**सह-संपादक**

सुप्रिया जाधव - (नाशिक)



वॅलेंटाईन-डे'चा भर एव्हाना ओसरला असेल. बऱ्याच जणांना/जणींना चांगले-वाईट अनुभव आले असतील.
चांगले अनुभव आलेले सध्या हवेत आणि बाकीचे साफ आपटले असतील.
अर्थात असं कोणी चार-चौघात मान्य करणार नाही.
पण... असो.

तर, अशाच काही गमती-जमती
(देवदासांचे दुख:द अनुभव)
सांगणारा हा अंक  आपल्यासमोर सादर करत आहोत.
आपले सुख- दु:ख हा अंक वाचल्यानंतर,
तुम्ही काही काळ जरूर विसरणार आणि हसणार
(तुम्हाला काय जातय हसायला?, असे देवदास म्हणत असतील).
हसला नाहीत तर या अंकाचे पैसे परत मिळतील. हो,  त्याची गॅरेंटी मी घेते.
(हा अंक विनामूल्य आहे तोवरच.)

बाळाचे पाय पाळण्यात दिसतात, हे अगदी खरय...
आपल्या कथेतील नायक पप्पू-कम-देवदास ह्याची तयारी तर बघा...म्हणजे वाचून बघा.....

कॉलोनितला टिल्लू
वय वर्ष पाच
सिंगल राहायचा आता
वाटतो म्हणे जाच

पप्पू चा ब्रेक-अप
झाला म्हणे इतक्यात
त्याच्याच पिंकीला
प्रपोज मारतो झटक्यात

valentine's day ला
चॉकलेट करू शेयर
उघड उघड देतो रेड-रोज
मला नाही फियर !



ती खूप cute आहे
गोड गोड हसते
४ वर्षांची पिंकी
सिनियर के.जी ला असते

म्हंटल टिल्लू बाबा रे!
तू नमुनाच एक आहेस !
जिच्याबद्दल बोलतोयस
ती माझीच लेक आहे !

*-प्रिया गवई*



पिंकीच्या आईने चांगली समजूत काढल्यावर
(काही नाही, तिने फक्त पप्पूच्या बाबांना याची
पप्पूगिरी सांगितली, आणि बाबांनी अजिबात
गंभीरपणे न घेता याची रवानगी हॉस्टेलवर केली )
खरंतर यामुळे पप्पूगिरीला अजुन प्रोत्साहनच मिळाले,
त्याचं काय असतं   साखरेचे खाणाऱ्यालाच...
बरोब्बर ओळखले!
आणि इच्छा तेथे मार्ग असतातच, नाही का?
आमच्या या देवदासची कहाणी खालच्या चारोळीने सुरू होते...

तू आहेस इतकी गोड, तुझं हसू कीती गोड...
तुझं ओझरतं दर्शनही माझं मन सहज जिंकतं!
तुझा बाप का गं खडूस, आई का गं भांडखोर,
मला पाहून तर तुझं कुत्रं पण मोठ्ठ्याने भुंकतं!!

*- चंद्रजीत कांचन*

मग या देवदासचे काय होते पाहुयात....



# गर्लफ्रेंड



तीन वर्षाची, कॉलेजची फी सगळी...
पहिल्याच दिवशी वसूल झाली

तिला पाहिले, तीचा जाहलो
क्षण एक ही ना, दूर राहिलो...

खळ्या गालातल्या त्या... ती कातील अदा
तीच्या लाजण्यावर, मी झालो फिदा

तीच्याच एका मैत्रीणीच्या आधारे,
लागली एकदाची माझी नैय्या किनारे

ते हसणे खिदळणे...रात्ररात्र गप्पा गोष्टी
त्या टाळया, गालगुच्चे....इतकी 'फ्रँक' दोस्ती ?



तीची साथ होती... मौसम ही मस्त होता
तीचा तो इशारा..... होकार स्पष्ट होता

विचारायचे...कसे? सारे ठरवून गेलो
बुजरा....जरासा मी, प्रेमात धीट झालो

गुलाबी कळी, कोवळी घेतली
ठरलेल्या ठिकाणी ती मला भेटली...
*****************************
म्हणाली सरळ... मला इंटरेस्ट नाही,
ईतर मुलींसारखी, माझी टेस्ट नाही

तीला पौरुषाची हव्यास नव्हती...
सखीची 'जवळच्या' तीला प्यास होती

बसला धक्का... कळता हकिकत नवी
स्वतः साठीच तीला एक 'गर्लफ्रेंड' हवी
स्वतः साठीच तीला एक 'गर्लफ्रेंड' हवी !!!
-शब्दशः शब्दशहा !

बिच्चारा! मग त्याच्या मनात विचार येतो.....



शांती अन् क्रांतीला सोडून
तुला प्रपोज केलं....
नशीबचं फुटकं साला
तेलंही गेलं तुपही गेलं
अन् हाती धुपाटणं आलं

*-रितेश*

मग हा दुसरी पारो शोधतो.. पण गंमत बघा काय होते....

माझ्या हृदयाची बंद खिडकी...
सहज हळूवारपणे खोललीस!
पण तुझा बाप पोलीसात आहे
हे आधी का नाही बोललीस???

*-चंद्रजीत कांचन*

आता एवढयावर थांबेल तो पोलिस कसला?.....





# जेंव्हा तिच्या  बाची , अन माझी गाठ झाली

जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली
धोपटावा धोबीघाट , तशी माझी पाठ झाली

हातात होती काठी
सजलेली माझ्यासाठी
पळता पळता माझी, पुरेवाट झाली
जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली

मदतीस न कोणी आले
मित्र सारे पसार झाले
तिच्या समोर फुगलेली, छाती सपाट झाली
जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली

हात माझा जोरात पिळला
मी शेवटचा आवंढा गिळला
मर्दुमकी आमची तेथे, भुईसपाट झाली
जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली

धरली माझी बखोटी
केली माझी चकोटी
तमाशा पाहणारांची, गर्दी दाट झाली
जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली

आता रात्री मी, जागतो दचकून
मानगुट माझी, धरलेली कचकून
थंडीत घाम फुटलेली, माझी पहाट झाली
जेंव्हा तिच्या बाची , अन माझी गाठ झाली

*-हरीश दांगट*



आणि  एवढयावर थांबेल तो देवदास तरी कसला?
मग कशी बशी एक चंद्रमुखी पटवायला निघाले राजे....

हा कागद पुरेना, ती शाई उरेना
हातही माझा होता पुरता दमला!
प्रेमपत्र वाचताच ती निघून गेली,
आता काय आम्ही एकटेच बोंबला?

*-चंद्रजीत कांचन*

काहीतरी करून जमवलच....आणि मग... एके दिवशी (चुकून) तिला म्हणाले....

हे असे कसे झाले
तुझ्यासाठी मन वेडेपिसे झाले
ती बाब तशी वेगळी
हलके हलके खिसे झाले

*-सनिल पांगे*

आता ती म्हणजे तीच होती.....तिने सारे तिच्या भावांना सांगितले... आणि काही वेळाने (जरा जास्तच वेळाने) तिला तिची चूक लक्षात आली. पण भाऊच ते, ते कसे चुकतील....??



विडंबन : कसे सोडतील सये...
संदीप खरेंची माफी मागून,



कसे सोडतील सये,
भाऊ मला तुझे असे,
सोडताना आणि सांग सोलतील ना,
गुलाबाची फुले जर दिली तुला रस्त्यावर..
धरु धरु मला सांग हाणतील ना..हाणतील ना....

चाबकाचा मारा मारा सोसताना देह सारा..
दुखे दुखे तन माझे पुरे
अंगावर ठसे ठसे कपडेही कसेबसे..
खोल खोल सुज आत शीरे..

दशा होइ वेडी खुळी त्वचा पण काळी निळी..
बघताना हापकून बसशील ना...

रोज तुझ्या गाडीतुन येइ उजडा चमन,
लागु देत नाही मला हवा,
लगे त्याला कळेलच आणि तेव्हा मारेलच,
कोण खेटावे तुझ्या भावा.

शरीराचे कोटी कण फटक्यांचे सारे व्रण..
रोज रोज आणखीच दुखतील ना..

आत नाही बोलायाचे जरा जरा जगायाचे,
पाळुनीया अंतर बरे,
क्षणभर जगु देत पायवर चालु देत,
नाहीतर माझे काय खरे.

जरा काळ सरु देना भाउ कुठे जाउ देना,
तेव्हा तुला काय हवे पुरवील ना...

गुलाबाची फुले जर दिली तुला रस्त्यावर..
धरु धरु मला सांग हाणतील ना..हाणतील ना....

*– शशांक प्रतापवार*

आता इतकं करून लग्नाच्या लाडवापर्यंत गोष्ट कशी बशी पोहचते.अर्थातच! हा आपल्या कथेतील नायक आहे.. आणि नायिका भेटल्याशिवाय आपल्याकडचे चित्रपट पूर्ण कसे होणार?)



स्वभाव,वागणूक पडताळण्याचा,
गेला तो जमाना.......
आता मुलीचा बाप विचारे,
आहे का US /UK चा परवाना?......

नजरेचे बाण आता,
झालेत पक्के चोरटे.......
टु व्हीलर नव्हे,
नजर ४ व्हीलर कडे वळते......

राशी, पत्रिकेत नाही रस,
मागती चक्क बँक balance.....
अन त्यावर हि गजहब , म्हणे
दाखवा Salary स्लीप ऑफ d 3 months......

मुलीचेही काय नखरे,
फारच फार मुंबई किंवा पुणे......
नको बंगलोर, हैदराबाद transfer,
पण US/UK ला ना उणे.......

म्हणे आमचा हिला,
मोकळेपणा आवडे.......
बंगला नसला तरी चालेल....
पण Three BHK पुरे

मोकळेपणा इतका कि,
आई बाबा नको घरी......
आपण राहू स्वतंत्र,
हे नव सोकावालय तंत्र......

काही बोला पण,
लग्नाचा लाडू झालाय 'भारी'
करावा त्याचा आहार,
की जावे तयाचा आहारी?....

-संदेश

बिचारा इतक्या महतप्रयासाने इथपर्यंत मजल गाठतो
आणि त्याला वरीलप्रमाणे साक्षात्कार होतो....



कितीही अवघड वाटला तरी
लग्नाचा डोंगर चढावाच वाटतो...
जिंकू किंवा मरु, माहीत असलं तरी
वैयक्तिक साक्षात्कार घडावाच लागतो...
-इति मी...

नकटयाच्या लग्नाला सतरा विघ्नं, म्हणतात ते काही खोटं नाही.....
(कविवर्य सुरेश भट यांची मन:पूर्वक माफी मागून)

बायको होता होता ती मेहूणीच झाली !
आता पुन्हा भविष्यांच्या पेटवा मशाली !

आम्ही नेमकी तिचीच आस का धरावी ?
जे कधीच नव्हते त्याची वाट का पहावी ?
कसा सूर्य शब्दांच्या वाहतो पखाली !

तीच घाव करिते फिरुनी ह्या जुन्या जखमावरी ;
तोच दंश करिती आम्हा मनस्ताप हे विषारी !
आम्ही मात्र ऐकत असतो माहेरची खुशाली !

तिजोऱ्यात केले हिने बंद जन्म साती,
आम्हावरी संसारची पडे धूळमाती !
आम्ही ते दिवाने, ज्यांना पटली ना साली !

अशा कुठे अजून आम्ही गाडल्या उमेदी ?
असा कसा जो तो येथे होतसे घरभेदी ?
ह्या अपार दुःखाचीही चालली टवाळी !

उभा संसार झाला आता एक बंदीशाला
जेंव्हा सालीचा घाणा बायकोस कळाला !
कशी मेहूणी दुर्दैवी अन् बायको भाग्यशाली !

धुमसतात अजुनी विझल्या चित्ताचे निखारे !
अजुन स्वप्न जागत उठती उपट्सुंभ सारे !
आसवेच लग्नानंतर आम्हाला मिळाली !

-सूर्यकांत डोळसे,पाटोदा (बीड).



त्याचं झालं असं लग्न ठरवायला गेला असताना जिच्यासाठी मागणी
घालायची तिच्याकडे लक्ष कमी..म्हणजे कहीपे निगाहे,
कहीपे निशाना...सारखं! मग सासरे बुवांची काय चूक?
असो!

आता बायको या विषयावर पुन्हा कधीतरी सविस्तर अंक काढू.
(अर्थात एक-दोन अंकात न मावणारा खरंतर..अनंताहुनी पुढेच
जाणारा विषय आहे हा...) तर बायको या व्यक्तीला कायम
सर्वात
आधी प्राधान्य द्यावे(च) लागते हे जाणकारांस सांगणे न लगे..

बायकोच्या हट्टापायी काय काय करावे लागते ते पहा....

**वॅलेंटाईन वॅलेंटाईन!!**

"संत वॅलेंटाईन, काय माणूस होता सांगू ! एकदम झक्कास. प्रेमास अमर करून गेला बेटा!
त्याची समाधी कुठे आहे सांगाल का? ऑर्किडची फुलं सजवायची होती त्यावर मला.",
आता हे मी लिहित नाहीये किंवा लिहितच असेन तर माझं मानसिक स्वास्थ्य
बिघडलं असेल हे सुज्ञास सांगणे न लगे.

"वॅलेंटाईनविषयी लिही ना", असं विनंतीवजा फर्मान माझ्या गुलबक्षीने (गर्लफ्रेण्ड हो!)
गेल्या आठवड्यात काढल्यावर मी माझं मराठी टायपिंगचं सॉफ्टवेयर
कॉम्प्युटरमधून काढून टाकलं होतं.

स्वीटीच्या मागल्या बर्थ डे च्या दिवशी तिल्या दिलेल्या ग्रीटींग कार्डावर तिला
मराठीत शुभेच्छा लिहिताना अक्षरांच्या स्वरूपात कोंबड्यांच्या पायाला शाई लाऊन
त्या अक्षरशः कागदावर नाचवल्या होत्या, गर्लने अगम्य लिपी वाचून
अन त्यावर कानापर्यंत खोटं हासून मला "आय लव यु" म्हणत कडकडून मिठी मारलेली
मला लख्ख आठवतेय (हे सांगताना माझ्या सावळ्या गालावर लाली चढलीय.
ती दिसत नसेल तर तो तुमचा प्रश्न आहे).

त्यामुळे ती मला पुन्हा माझ्या स्वाक्षरीत कागदावर लिहायला लावील ह्याची शक्यता
अक्षय खन्नाच्या टकल्यावर केस उगतील इतकी कमी होती.त्यामुळे मराठी
सॉफ्टवेयर अनईन्स्टॉल केल्यावर वॅलेंटाईनच्या कचाट्यातून मी तसा सुटलो होतो.

पण दुसऱ्या दिवशी कॅडबरीला हे कळल्यावर ती मला हट्टाने म्हणाली,
"हे काय रे विनू. कर ना पुन्हा इन्स्टॉल!".
त्यासाठी तिने मला गालावर दोन मुकेही दिले होते.
(लाजून पाणी झालोय.आता ते आमच्या नळाला का येत नाही हा सध्या आमचा प्रश्न आहे).



त्या दोन पाप्यांच्या बदल्यात मी पुरता फसलो होतो.
आज लाडू लवकर घरी येणार होती.
तोवर मला लेख संपवायचा होता.
पण पुढच्या तीन ओळी सोडून टेपा मारता येत नाहीत.
आठवून आठवून बेजार झालोय.
त्यातूनच उत्पन्न होणारे हे पर्सनल विचार. भावनांचा उद्वेग म्हणणे अधिक संयुक्तिक होईल.

हे बघा प्रेमाचा एक कॅलेण्डर दिवस आहे. १४ फेब्रुवारी. त्याला म्हणतात वॅलेण्टाईन डे.
इ.स. २००० साली जेव्हा गणू आजोबांना मी वॅलेंटाईनची व्याख्या सांगितली तेव्हा ते
वॅलेंटाईन ऐवजी टर्पेंटाईन दिवस समजून कवळीवजा हसले होते.
मी ही त्या पी.जे वर हसलो.

कारण गणू आजोबांची नात म्हणजे माझी पप्पी, अन तिचे आई वडीलही तेव्हा हसत होते.
खरं तर इ.स. २००० पूर्वी वॅलेंटाईनडेला भीक घालणाऱ्यांपैकी मी नव्हतोच.
पण तेव्हाच्या कॉलेज फेस्टिवलमध्ये ही ब्युटीक्वीन झाली.
मी तिला २२ गुलाबं पाठवली होती. एकूण २३ गुलाबं मिळून ही ब्युटीक्वीन झाली होती.
त्या २२ गुलाबांसाठी मित्रांकडून घेतलेली देणी इंजिनियरींगच्या शेवटच्या
वर्षापर्यंत सुटली नव्हती. त्याच मित्रांनी दिलेल्या शिव्याशापांचा हा परिणाम असावा.
आज मी वॅलेंटाईनविषयी खोटंनाटं लिहितोय.अहो कीबोर्डमधून शब्द फुटत नाहीत!

ह्याच शोचनीय अवस्थेत मला फ्लॅशबॅक दिसतो तो २००० सालच्या पहिल्या वॅलेंटाईनचा.
आता पहिला वॅलेंटाईन डे म्हणजे तिच्यासाठी तिचा बर्थडेच जणू. शिवाय ६ जून.
तिचा खरा बर्थडे. ५ जूनचा मॉक बर्थडे. त्याव्यतिरिक्त २० सप्टेंबरही. हा माझा बर्थडे.
पण ह्याही दिवशी पैसे माझ्याच खिश्यातून सांडायचे म्हणून हाही जणू तिचाच बर्थडे.
"दिवाळी" किंवा "दिवाळे" ह्याला एक सुसंगत शब्द म्हणजे
"माझ्या स्विटीपायचा बर्थ डे" बरं तर मी सांगत होतो,
माझ्या पहिल्या वॅलेंटाईनडे ची कथा. इसविसन १४ फेब्रुवारी २०००.
बांद्रा-गेईटीच्या रणांगणावर विनितभाऊ एकटे उभे ठाकले होते.
माझ्या स्ट्रॉबेरीला 'कुछ कुछ होता है' बघायचा होता अन् मी मात्र जॅकी चेनचा 'शांघाय नाइट्स' बघितला असता तर!

ह्या स्वप्नात कानाशी घोंघावणाऱ्या माशा हाकलत गेटशी उभा होतो. खिशातल्या २०० रूपयांची सांगड आजच्या दिवशी कशी घालता येईल ह्यासाठी मी आदली रात्र प्लानिंग करत जागवली होती. त्यासाठी मी मोठ्या भावाचे एम.बी.ए.चे आपत्ती व्यवस्थापनाचे म्हणजे सोप्या भाषेत डिसॅस्टर मॅनेजमेण्टचे नोट्स वाचत आराखडे बांधले होते. पुढच्या अर्थशास्त्रीय नोबेल पारितोषकासाठी मी तोच रूपीज २०० वर्सेस वॅलेंटाईनडे हा शोधनिबंध प्रस्तुत करणार आहे. त्यासाठी लागणारे ५ वर्षांचे वॅलेंटाईनडेजचे जमाखर्च मी स्टॅटिस्टिकल डेटा म्हणून जमवून ठेवले आहेत.

गुलबक्षी आल्यावर मी जॅकी चेनला चिनीत 'शेशे"करून 'कुछ कुछ होता है!' मधे एग्ज़ॅक्ट्ली काय होतंय हे पहायला थिएटर मध्ये घुसलो. आता का घुसलो हा प्रश्न मला विचारू नका. ओव्हरॅक्टींगचे क्लासेस चालवणारा हिरो, म्हशीपेक्षा जाड अन सावळी हिरोईन, नातीच्या वयाचे चाळे करणारी आजी अन आजीच्या वयाची ऍक्टींग करणारी नात पाहून मला शॉर्ट स्कर्ट मधली टीना मेली तेव्हा ह्या चित्रपटात राम नाही म्हणून खूप रडू कोसळलेलं. त्या माझ्या रडण्याला ही आजही एक फिल्मी इमोशनल मोमेण्ट मानून चालतेय. तिला अजूनही वाटते की "कुछ कुछ होता" माझा आवडता पिक्चर असावा. पण एक मात्र मानायला हवं, तिचा हा ग्रह झाल्यानेच मी प्रेमाची पुढची पायरी चढू शकलो. शिवाय चित्रपट ५० रूपयात आटोपला. तोवर टॅक्स फ्री झाला होता न तो.
(डिसॅस्टर मॅनेजमेण्ट रॉक्स!!!)

एका अतिसामान्य मुंबईकराप्रमाणे बांद्राला फिरायला आल्यावर बॅण्डस्टॅण्डला येऊन कॉफी पिऊन काशीयात्रेचे समाधान घेऊन जाणे ह्याला मीही काही अपवाद नव्हतो. मग पिक्चर संपल्यावर उत्साहाच्या भरात रिक्षा पकडली आणि डिसॅस्टर मॅनेजमेण्टचा पुरता फज्जा उडाला. ३५ रुपये रिक्षाने चापले. आता ११५ रुपयात बॅण्डस्टॅण्डची कॉफी आणि आर्चिजचं गिफ्ट असा प्रोग्रॅम आटपायचा होता. पण नियतीने पुन्हा कच खाल्ली आणि बॅण्डस्टॅण्डवर नेहेमीच्या शंभू कॉफी हाऊसच्या ठिकाणी नवीन बरिस्ता उघडलेले होते. ते बघून रसमलाईला मोह आवरेना. तिच्या हट्टापाई मग मी आढेवेढे घेत प्रेमात आकंठ बुडाल्याची ऍक्टींग करत खिशातल्या १०० च्या नोटेला गोंजारत एका टेबलावर बसलो. चॉकोलेट लाटटेच्या नावावर स्वार होऊन ११० रूपयाचं बील आलं आणि प्रेम अन पैसा ह्या रणसंग्रामात मी धारातीर्थी पडलो. मला वीरगती प्राप्त झाल्यासारखे वाटत होते.

बरिस्ताने मला बिरस्ता करून सोडले होते. समुद्राच्या काठाने चालताना भोवती दिसणारे राहुल अंजली आधीच एकमेकांना आय लव्ह यु बोलून युद्ध जिंकल्याचे मला दिसत होते. ती शेवट्ची मोक्याची लढाई मला जिंकायची होती. मी घरातल्या कुंडीतला एक गुलाब कापून तो उजवीकडच्या खिशात लपवलेलं. (माझे २० रूपये वाचले होते. डिसॅस्टर मॅनेजमेण्ट रॉक्स अगेन!!!!)

मी ते काढून अन् 'आय लव्ह यु' म्हणून तिच्या हवाली केलं. तिनं मग त्याच गुलाबासारखं हसून दाखवलं अन मला किस्स केलं. मी बससाठी उरलेले ५ रुपये विसरलो होतो!

भानावर येईस्तोवर सूर्य समुद्रात अन बॅण्डस्टॅण्डची जोडपी झुडुपात वा बागेत पांगली होती. माझ्या मेकॅनिक्सच्या सात अस्यान्मेण्ट्स लिहायच्या बाकी होत्या. त्या लिहिणे प्रेमा इतकेच गरजेचे होते. त्यामुळे अजून थांबणे शक्य नव्हते. मग तिनंही माझा निरोप घेतला अन ती बांद्राला तिच्या मावशीकडे निघून गेली. मी बांद्रा ते मालाड मासिक ट्रेन पास व नंतर २४३ नंबरच्या बस ने ४ रुपयात प्रवास करून १ रुपया वाचवला होता. मला आपत्ती व्यवस्थापन जमलं होतं.

तर असा गेला माझा पहिला वॅलेंटाईन डे. नंतरचेही तसेच गेले. वॅलेंटाईनडेचा स्पेशल पाल्य भत्ता २०० रुपयांवर कधी गेला नाही. नोकरी लागल्यावरही आज माझी अवकात ५०० रुपयांवर नाही हे नमूद करावे.

फ्रेण्ड्स ५०० रूपयात वॅलेंटाईनडे परवडला पण मी वॅलेंटाईनवर लिखाण करावे असा जाचक विचार हिच्या मनात आला कुठून असेल? मी ह्यातली पाळेमुळे शोधत असतो तोच दारावर बेल वाजते! पप्पी आली असेल, पण अजून लिखाण पूर्ण नाहीये! काय करावे? मी बिचकत बिचकत दार उघडतो....

... ही माझीच बेब असते. क्युट स्माईल देत. "हाय हनी", असं म्हणून मी तिला बिलगतो अन तोच लाईट जाते.... "ओह नो! मी वॅलेंटाईनवरचा लेख लिहित होतो. तो सेव्ह केला नव्हता!!"..... अशा मोक्याच्या क्षणाचा फायदा मी ऊठवला नसता तर माझ्या सारखा लुख्खा कुणी नसेल.... (आय ऍम सो विक्केड!)... ती मला बघून मधाळ आवाजात वॅलेंटाईनडे गिफ्ट मागते.... मी तिला माझ्या उजव्या खिशातलं गुलाब काढून देतो अन अनवधानाने म्हणतो, "अर्चिजमधला गुलाब आहे हो. घरातला नाही" ... ती उपहसाने म्हणते, "माहितीये मला! पहिल्या वॅलेंटाईनडेचे तुझे प्रताप!".... पण हे हिला कसं माहित की तो गुलाब घरचा होता?... मी माझ्याच विचारांत गुंततो अन ती पुन्हा गुलाबासारखं हसून दाखवते अन मला किस्स करून कवेत घेते....
तिनं मला अजूनही कवेत घेतलेय. मी मात्र अगदी मोक्याच्या क्षणी वीज गायब केल्याबद्दल रीलायन्स एनर्जीला वॅलेंटाईनडे गिफ्ट म्हणून कुंडीतला गुलाब पाठवायचा विचार करतोय.....

-विनीत  संखे

तर, वॅलेनटाईन-डे लग्न झाल्यावरही पिच्छा सोडत नाहीत....!
मला माहितेय म्हातारपण आलं तरी असे अजोबा लोक 'नाव घ्या' म्हटल्यावर म्हणत असतील...



*एकेकीला बघते म्हणत*
*मला झाड झाड झाडलं....*
*आमचे प्रताप पाहून हिने*
*गपकन् वरचं तिकीट काढलं...*

अशा अजोबांबरोबर वर्षानुवर्षे राहणाऱ्या आज्जीबाई तरी कमी असतील का?
त्या म्हणत असतील...

*मी वरचं तिकीट*
*काढलं तर काढलं....*
*तुम्हाला खाली, टाइमपास*
*करायला नाही सोडलं....*

असे आवाज आजोबांना नक्की एकू येत असतील याची मला खात्री आहे...
मग आजोबा मनात म्हणत असतील,

*मारुतीच्या देवळात आता*
*तेल घालायचे दिवस आलेत...*
*पंचवीशी उलटली म्हणून काय झाले?*
*गध्दे पन्नाशीचे दिवस आलेत...*

आज्जीबाई अशावेळी डोक्यावर हात मारुन घेत असतील, नक्कीच! दुसरं काय करणारेत बिचाऱ्या.
जे हयात असताना करू शकल्या नाहीत ते आता कसं जमेल?





बा. भ. बोरकर यांची माफी मागून
विडंबन : "माझ्या गध्दे पन्नाशीत"

माझ्या गध्दे पन्नाशीत
गड्या स्वप्न 'दिया'चे,
मना मनाच्यामधुन
गड फुटती लाडुचे ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
फंडु नट्यांचीच रास
सांगू कसे कुणा काय
फक्त फुलांचे सुवास ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
लै केली कारागिरी
मम प्रेमाची कुसर
हर नटीच्या दिवारी ॥

माझ्या गध्दे पन्नाशीत
चौपाटी नि खारे दाणे
पावसात एकट्याने
मजी तळूनिया खाणे ॥

माझ्या गध्दे पन्नाशीत
येते चांदणे मोहरा
आसावल्या लोचनांना
मिळेना एकही इशारा ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
मीच झुल्याविण झुले
भोळा-भाबडा-शालिन
किती किती पाटविले ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
गड्या साळीचा रे भात
वाढायला नसे मायेने
'करिना'चा डावा हात ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
डोईवर खेळे चांदी
कलपाची अगत्याची
नि टकलाची असे नांदी ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
गड्या सळसळतोय किडा
अतिफाजील तो हसे
सर्व बायकांचा चुडा ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
काळे 'काजोल'चे डोळे
त्यात 'ऐश्वर्यां'ची माया
'कॅथ' जन्मोजन्मी जळे ।

माझ्या गध्दे पन्नाशीत
धोंडे माती अन् खाणी
खोल आरक्त घावात
तरी नट्यांचीच गाणी ।

-रेणुका खटावकर (रेपाळ)
३०/११/२००९

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०,००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे. netaksharee@gmail.com